**राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयातील बाह्ययंत्रणेद्वारे मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या पदांकरीता निधी उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रः-पुमाप्र-२०२४/प्र.क्र.१३६/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१) शासन पत्र क्र. राछासे-२०२४/प्र.क्र. ६५/क्रीयुसे-३, दि. १४ ऑगस्ट, २०२४
२) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/पुरवणीमागणी / /१०/२०२४-२५/का-५/२८६१, दि. ०५ नोव्हेंबर, २०२४

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय छात्र सेनेच्या कार्यालयांसाठी बाह्ययंत्रणेकडून मानधन तत्त्वावर २०० पदे भरण्यास संदर्भ क्रमांक १ येथील शासन पत्रान्वये मान्यता दिली आहे. राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयातील बाह्ययंत्रणांद्वारे नियुक्त केलेल्या २०० कर्मचाऱ्यांचे माहे नोव्हेंबर, २०२४ पर्यंतचे मानधन अदा करण्यात आले असून माहे डिसेंबर, २०२४ ते फेब्रुवारी, २०२५ या तीन महिन्यांच्या कालावधीतील मानधन अदा करण्याकरीता निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयातील बाह्ययंत्रणेद्वारे नियुक्त केलेल्या २०० कर्मचाऱ्यांचे माहे डिसेंबर, २०२४ ते फेब्रुवारी, २०२५ या तीन महिन्यांच्या कालावधीचे मानधन अदा करण्याकरीता रू. १२१.०६ लक्ष ( अक्षरी रूपये एक कोटी, एकवीस लक्ष, सहा हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. राष्ट्रीय छात्र सेना, मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्र सेना "१०- कंत्राटी सेवा" (२२०४ ००१६) या उपलेखाशीर्षामध्ये सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे व पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेल्या निधीतून उक्त खर्च भागविण्यात यावा. उक्त रक्कम कोषागारातून आहरित करणेकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबंधित समादेशक अधिकारी / गट प्रमुख, गट मुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११८/व्यय-५, दि. १० फेब्रुवारी, २०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२१७१८१२११६९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department, 2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.02.17 18:13:50 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/परीक्षा) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी (संचालनालयामार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. संबंधित समादेशक अधिकारी/ गट प्रमुख, गट मुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना (संचालनालयामार्फत)
८. अवर सचिव, (व्यय-५) व (अर्थसंकल्प-८) वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१०. निवड नस्ती, क्रीयुसे-३